**येरवडा मध्यवर्ती कारागृह,पुणे यांच्या अखत्यारीतील २५० मीटर x २० मीटर जागा पुणे महानगरपालिकेस विकास कामासाठी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-०९१६/प्र.क्र. २१५(भाग-१)/तुरुंग-२**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २५ नोव्हेंबर, २०१६.

वाचा

१) गृह विभाग शासन निर्णय क्र. जेएलएम-१००८/प्र.क्र.५७/पीआरएस-२, दि.६ मे २००८

२) आयुक्त,पुणे महानगरपालिका, पुणे यांचे क्र. मआ/पथ/२४४१, दिनांक २६.७.२०१६ चे पत्र

प्रस्तावना :-

आयुक्त पुणे महानगरपालिका पुणे यांनी "एअरपोर्ट ते डेक्कन कॉलेज व्हाया हॉटमिक्स प्लँट या २० मीटर डी.पी. रस्त्याचे विकसन करणे," याकामी येरवडा मध्यवर्ती कारागृह,पुणे यांच्या अखत्यारीतील २५० मीटर X २० मीटर जागा पुणे महानगरपालिकेच्या ताब्यात देणेबाबत विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने कारागृह विभागाची सदर जागा पुणे महानगरपालिकेस हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

"एअरपोर्ट ते डेक्कन कॉलेज व्हाया हॉटमिक्स प्लँट या २० मीटर डी.पी. रस्त्याचे विकसन करणे," याकामी स.नं.१६० येथील कारागृह विभागाची २५० मीटर X २० मीटर जागा पुणे महानगरपालिकेस हस्तांतरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

१) सदर कारागृहाच्या जागेचा मोबदला म्हणून पुणे महानगरपालिकेने रु. १ कोटी इतकी रक्कम कारागृह विभागास द्यावयाची असून सदर रक्कम त्यांनी पोलीस गृहनिर्माण महामंडळ यांचेकडे जमा करावी.

२) सदर जमा होणाऱ्या रक्कमेतून पोलीस गृहनिर्माण महामंडळाने,कारागृह विभागाने सूचविलेली बांधकामे पूर्ण करून द्यावी.

३) शासन निर्णय,गृह विभाग क्रमांक जेएलएन १००८/प्र.क्र.५७/पीआरएस-२, दि. ०६.०५.२००८ मधील पुढील अटी व शर्ती या प्रकरणी देखील लागू राहतील:-

अ) पुणे महानगरपालिकेने कारागृहाच्या जमिनीवरील संपूर्ण अतिक्रमणे संयुक्त मोहिमेद्वारे हटवावीत.

आ) पुणे महानगरपालिकेने तुरुंगाच्या सरहद्दीतुन ६ फूट उंचीची भिंत व त्यावर ४ फूट उंचीपर्यत तार अशी संरक्षक भिंत उभारुन द्यावी.

इ) सदर शासकीय जमीन पुणे महानगरपालिकेस द्यावयाची असल्याने महसूल व वन विभागाच्या अटी व शर्तींच्या अधीन राहील.

२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी आयुक्त,पुणे महानगरपालिका,पुणे यांच्याकडून वरील अटी व शर्ती मान्य असल्याचे लेखी स्वरुपात घ्यावे. तसेच, शासकीय जमीन हस्तांतरीत करण्याबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन सदर जागा पुणे महानगरपालिकेस हस्तांतरीत करण्याची कार्यवाही अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१६११२८११३७१२३०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jaysing L Pawara
Date: 2016.11.28 11:41:45 +05'30'

(ज.ल.पावरा)
उपसचिव, गृह विभाग

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (अ व सु), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.
४) सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
५) विभागीय आयुक्त, पुणे
६) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७) आयुक्त, पुणे महानगरपालिका पुणे.
८) जिल्हाधिकारी, पुणे,
९) कारागृह महानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) कारागृह उपमहानिरीक्षक, (पश्चिम विभाग), पुणे,
११) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य- १ मुंबई,
१२) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य -१ मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४) उपसचिव ( पोल- ७) / (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१५) अधीक्षक येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे.
१६) निवड नस्ती (तुरुंग-२).